**राज्यातील अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना**
**परदेश शिष्यवृत्ती योजना**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन शुध्दीपत्रक क्रमांक इबीसी -२०१०/प्र.क्र.१९४/ मावक- २,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २८ ऑक्टोबर, २०१०

**वाचा -**
१. शासन निर्णय क्र. इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक-२, दि. ११.६.२००३
२. शासन निर्णय क्र. इबीसी-२००४/प्र.क्र.१०२/मावक- २, दि. ५.८.२००४
३. शासन निर्णय क्र.इबीसी-२००६/प्र.क्र.३२९/मावक-२, दि. १७.६.२००६
४. शासन निर्णय क्र. इबीसी-२०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दि. १५.७.२०१०
५. शासन शुध्दीपत्रक क्र. इबीसी-२०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दि. १०.८.१०

**शासन शुध्दीपत्रक** - राज्यातील अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशी शिष्यवृत्ती देण्याकरीता सन २०१०-११ मध्ये सुधारीत नियमावली संदर्भाधीन क्र.४ वरील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेली आहे. सदरहू शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मधील अ.क्र.४ पुढीलप्रमाणे आहे:-

४. "शिक्षणामध्ये तीन वर्षापेक्षा जास्त खंड (गॅप) असलेले विद्यार्थी सदर शिष्यवृत्ती मिळण्यास पात्र ठरणार नाही. मात्र त्यापेक्षा कमी कालावधीचा खंड (गॅप) असलेल्या विद्यार्थ्यापेक्षा नुकतीच परिक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीसाठी प्राधान्य देण्यात येईल"

तसेच सदरहू शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मधील अट क्र.९ ही पुढीलप्रमाणे आहे:-

९. "तसेच एका कुटुंबातील फक्त एकाच अपत्यास या योजनेचा एकदाच लाभ घेता येईल व कुटुंबातील हयात मुलांमधील तिस-या व त्यापुढील अपत्यास या योजनेचा लाभ दिला जाणार नाही." असे नमूद केलेले आहे.

**या दोन्ही अटी रद्द करण्यात येत आहेत.**

हे शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक क्रमांक २०१०१०२८२०१६३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( भो.गो.गोदोंळे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

कृ.मा.प.....

G:\mavak-2\2010\gr-2010.lwp

मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक
मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
कक्ष अधिकारी, विधानमंडळ अनुसूचित जाती कल्याण समिती (ड-४), १५ वा मजला, विधानभवन, मुंबई - ४०० ०३२. (५ प्रतीसह)
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवड नस्ती, मावक २